शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, लातूर संस्थेच्या परिसरातील सर्व इमारतीमध्ये अद्ययावत अग्निशमन यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांक : जीएचएल -२०१९/प्र.क्र.३३१ /प्रशा-१

गो.ते.रुग्णालय आवार,नवीन मंत्रालय, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : १२ नोव्हेंबर, २०२१

वाचा : संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक: संवैशिवसं / शावैमलातूर /आगप्रतिबंधकउपाययोजना/ प (आय)/३१८३७/१९, दि.०५.१२.२०१९

शासन निर्णय :

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, लातूर या संस्थेच्या परिसरातील सुरक्षिततेच्या दृष्टीने सर्व इमारतीमधील आंतररुग्ण कक्ष, बाह्यरुग्ण विभाग, शस्त्रक्रियागृहे, वसतीगृहे, ग्रंथालय, प्रशासकीय इमारत इत्यादी ठिकाणी अद्ययावत अग्निशमन यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठीच्या कामास खालील तक्त्यात नमूद अंदाजपत्रकाच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रस्तावित किंमत |
|---|---|---|
| १. | Providing Fire Hydrant Sprinkler & Fire Alarm System at Varioun Building at Govt.Medical College & Hospital Campus Latur. | ६,२९,९०,८१९ |
| | एकूण | ६,२९,९०,८१९ |

सदर अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१. सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.

२. प्रस्तुत विषयी विभागास सादर करण्यात आलेले अंदाजपत्रक व नकाशे संबंधित अधिष्ठाता यांनी स्वाक्षांकित करावे.

३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. सदर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येणा-या कामांच्या अनुषंगाने "राष्ट्रीय सुरक्षा परिषद" या संस्थेने केलेल्या विलासराव देशमुख शासकीय वैद्यकीय विज्ञान संस्था, लातूर संस्थेच्या अग्नि व विद्युत सुरक्षा उपाययोजनांबाबत सादर केलेला अहवाल संबधित अधिष्ठाता यांनी पुढील उचित कार्यवाहीस्तव तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या निदर्शनास आणावा.

१०.प्रस्तुत विषयी मा. उच्च न्यायालय, मुंबई , खंडपीठ नागपूर यांनी याचिका क्रमांक ३४२७/२०००, सी.एच.शर्मा व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर प्रकरणी दिनांक ३०.०६.२०२१ रोजी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने तात्काळ विहीत कार्यपध्दतीनुसार निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

११.सदर कामासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्च होवू शकणाऱ्या निधीच्या मागणीसाठी आगामी विधीमंडळ अधिवेशनात सदर कामांसाठी निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी संबंधित लेखाशीर्षात पुरवणी मागणी प्रस्ताव संचालनालयामार्फत सादर करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

१२.विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-८

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,

१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३ / प्र.क्र.३० / २०१३ / विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११११२१६४६३९१४१३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2021.11.12 19:50:07 +05'30'

( प्रकाश सुरवसे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
२) महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
४) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५) अधिष्ठाता, विलासराव देशमुख शासकीय वैद्यकीय विज्ञान संस्था,लातूर.
६) कार्यकारी अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
८) निवडनस्ती (प्रशा-१).